प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयातील आस्थापनेंतर्गत नियोजन शाखेतील योजनेतर योजनेखालील ४ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- एफएसटी-०३/२३/प्र.क्र.६५/फ-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २० मार्च, २०२३

वाचा :- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२३ (२२-२३)/१९९, दि.२५.०१.२०२३

२) शासन निर्णय क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६९/फ-४, दि.२६.०९.२०२२

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयातील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ४ (चार) अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील ४ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे.

३. उक्त परिस्थितीत प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील योजनेतर योजनेखालील ३ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ४ अस्थायी पदांना (विवरणपत्र-अ प्रमाणे) दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे. सदर मंजुरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षात मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयातील पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौण शीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| | ०१ संचालन व प्रशासन |
| **उपशीर्ष** | (०१)(०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०८.०२.२०२३ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०३२०२०२३३७४३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सोबत :- विवरणपत्र "अ"**

VINAYAK SHASHIKANT JAKHALEKAR

Digitally signed by VINAYAK SHASHIKANT JAKHALEKAR
Date: 2023.03.24 22:19:17 +05'30'

**( वि. श. जाखलेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०३/२३/प्र.क्र.६५/फ-४,**
**दि. २०.०३.२०२३**

**विवरणपत्र "अ"**

**प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या कार्यालयातील आस्थापनेंतर्गत नियोजन शाखेतील २०२३-२०२४ मध्ये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदांची यादी**

| अ. क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/पदे २०२२-२०२३ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुख्य वनसंरक्षक (वनसंवर्धन) | १ | शा.नि.क्र.एफवायपी-१०७/२२५४९५/ एक्स, दि.०१.०६.१९७४ वनसंरक्षक (माहिती व तंत्रज्ञान व प्रसिध्दी) या पदाची श्रेणीवाढ शासन अधिसूचना क्र. आयएफएस-२०११/प्र.क्र.१६५/एफ-७, दि.१६.०६.२०११ अन्वये मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प व लेखापरिक्षा) अशी करण्यात आली होती. आता महाराष्ट्र शासन अधिसूचना क्र.IFS-२०१४/CR-९३/G-७ दि.३०.७.२०१४ अन्वये पूर्वीचे मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प व लेखापरिक्षा) हे पद नोडल सेलकडे वळती करुन मुख्य वनसंरक्षक (वनसंवर्धन) करण्यात आलेले आहे. | शा.नि.क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६९/फ-४, दि.२६.०९.२०२२ |
| २ | विभागीय वन अधिकारी | २ | शा.नि.क्र.एफडीएम-१०८६/१५०७२४२ प्र.क्र.४/फ-३ दि.२२.८.१९८५ स.व.स. या पदाची श्रेणीवाढ शा.नि.क्र.एमएफएस-२००९/२०१३/प्र.क्र.२६४/फ-८ दि.२२.१२.२०११ अन्वये विभागीय वन अधिकारी अशी करण्यात आलेली आहे. | शा.नि.क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६९/फ-४, दि.२६.०९.२०२२ |
| ३ | मुख्य लेखापाल | १ | शा.नि.क्र.एफडीम-१०८२/६०५१७ दिनांक १८.०५.१९८२ | शा.नि.क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६९/फ-४, दि.२६.०९.२०२२ |

***************